महाराष्ट्रातील १७६- वांद्रे पूर्व (मुंबई उपनगर जिल्हा)व २८७- तासगाव कवठेमहांकाळ(जिल्हा सांगली) या २ विधानसभा मतदार संघातील पोटनिवडणूकीकरिता त्या क्षेत्रातील दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि आस्थापनांमध्ये कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी अथवा दोन तासांची सवलत देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

शासन परिपत्रक क्रमांक:- मतदान-२०१५/प्र.क्र.६७/कामगार-९

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक :-६ एप्रिल, २०१५

**संदर्भ :** (१) भारत निवडणूक आयोगाचे क्रमांक ७८/२०१५/EPS/७७८, दि.२४.३.२०१५ चे पत्र

(२) भारत निवडणूक आयोगाचे क्रमांक ECI/PN/२३/२०१५, दि.१०.३.२०१५ चे पत्र

## परिपत्रक

भारत निवडणूक आयोगाने महाराष्ट्रातील १७६- वांद्रे पूर्व (मुंबई उपनगर जिल्हा) व २८७- तासगाव कवठेमहांकाळ (जि. सांगली) या २ विधानसभा मतदार संघातील पोटनिवडणूका शनिवार, दिनांक ११ एप्रिल,२०१५रोजी घेण्याचे ठरविले आहे.

२. त्यानुसार उपरोक्त २ मतदान क्षेत्रातील मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्याची योग्य संधी प्राप्त करुन देण्याच्या दृष्टीने या क्षेत्रात कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी भरपगारी सुट्टी / अथवा कामाच्या तासामधून मतदान करण्याकरिता दोन तासांची सवलत देण्याबाबत योग्य ते निदेश सर्व संबंधितांना तात्काळ देण्याबाबत संदर्भ क्रमांक (१) येथील पत्रान्वये भारत निवडणूक आयोगाने कळविले आहे.

३. लोकप्रतिनिधीत्व अधिनियम,१९५१ मधील नियम १३५ (ब) नुसार **महाराष्ट्रातील १७६- वांद्रे पूर्व (मुंबई उपनगर जिल्हा) व २८७- तासगाव कवठेमहांकाळ(जिल्हा- सांगली) या २ विधानसभा मतदार संघा**तील पोटनिवडणूकीच्या पार्श्वभूमीवर या क्षेत्रातील विविध आस्थापना, दुकाने आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापनां तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि आस्थापनां यांना सूचना देण्यात येत आहेत की,

या विधानसभा क्षेत्रात शनिवार दि.११ एप्रिल,२०१५ रोजी सर्व दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम, इतर आस्थापनां तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि आस्थापनातील कामगारांना सदर निवडणूकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी अथवा कामाच्या तासामधून मतदान करण्याकरिता दोन तासांची सवलत देण्यात यावी.

४. लोकप्रतिनिधीत्व अधिनियम,१९५१ मधील नियम १३५ (ब)४ नुसार मतदानाच्या दिवशी कामगारांच्या अनुपस्थितीमुळे धोका अथवा मोठया प्रमाणावर नुकसान हाईल अशा आस्थापनेतील उद्योगातील कामगार मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी संपूर्ण दिवसाची सुटटी देता येणे शक्य नसल्यास अशा आस्थापनेतील / उद्योगांतील कामगारांना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या , निर्यात व्यवसायात असलेल्या कंपन्या, कायम / अखंडीत उत्पादन सुरु असलेल्या कंपन्यामधील कामगारांना मतदानाचा हक्क बजावता येईल अशा पुरेशा वेळेची सवलत देण्यात यावी.

५. सदर परिपत्रक सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक नस्ती क्र संकिर्ण २०१५/प्रक्र २३५/१५/३३ दि.१.४.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०६१७५२४८३११० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digambar Sonusing Rajput

Digitally signed by Digambar Sonusing Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Digambar Sonusing Rajput
Date: 2015.04.06 18:03:34 +05'30'

**( दि.सो.राजपूत )**

**शासनाचे उप सचिव**

**प्रत** - उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधीत आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित:-

१. सचिव, भारत निवडणूक आयोग, निर्वाचन सचिव, अशोक रोड, नवी दिल्ली ११०००१

२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

३. अवर सचिव (कार्यासन-५), राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकिय भवन, मुंबई-३२.

४. कामगार आयुक्त, बांद्रा, मुंबई.

५.संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बांद्रा, मुंबई.

६.संचालक, बाष्पके, संचालनालय, बांद्रा, मुंबई.

७.जिल्हाधिकारी, मुबई उपनगर जिल्हा.

८.जिल्हाधिकारी, सांगली

९.आयुक्त, मुंबई महानगर पालिका.

१०.मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, सांगली

११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

१२.कामगार विभागातील सर्व कार्यासने

१३.निवडनस्ती (कामगार-९)

**प्रत माहितीसाठी :-**

१.मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई

२.मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई

३.मा.मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.